**श्री. एस. बी. अग्रवाल, महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या जागतिक बँक कार्यालय, वॉशिंग्टन (USA) येथील अभ्यास दौऱ्यास व त्याकरीता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकिर्ण-१०१९/७३९/प्र.क्र.१३५/का.९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३ जानेवारी, २०२०

**संदर्भ :** १. वाणिज्य आणि उद्योग मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र दि.१८.१२.२०१८ व दि.३०.१०.२०१९.
२. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र दि.२६.१२.२०१९.
३. विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-१०१९/७३९/प्र.क्र.१३५/का.९ दि.०२.०१.२०२०.
४. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र दि.०३.०१.२०१९.

**प्रस्तावना :**

जागतिक बँकेच्या व्यवसाय सुलभता अहवालामध्ये भारताचे मानांकन उंचवण्याच्या अनुषंगाने वाणिज्य आणि उद्योग मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडून दि.०९.०१.२०२० ते दि.१०.०१.२०२० दरम्यान अभ्यास दौरा आयोजित करण्यात आला आहे. सदर अभ्यास दौऱ्याकरिता प्रस्तावित करण्यात आलेल्या शिष्टमंडळामध्ये महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचा समावेश करण्यात आला आहे. व्यवसाय सुलभता अहवालातील Enforcing Contracts हे निर्देशक राज्य शासनाशी संबंधित असल्याने सदर अभ्यास दौ-यामुळे याबाबत मा.उच्च न्यायालयाच्या सहमतीने आवश्यक सुधारणा करता येणे शक्य होणार आहे. त्यामुळे जागतिक बँकेच्या मानांकनानुसार भारताचे स्थान उंचविण्याचे दृष्टीने सदर अभ्यास दौरा अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. याकरीता मा.मुख्य न्यायाधीश, मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी श्री. एस. बी. अग्रवाल, महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे नाव निर्देशित केले आहे. त्यानुसार, संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये श्री. एस. बी. अग्रवाल, महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या जागतिक बँक कार्यालय, वॉशिंग्टन (USA) येथील अभ्यास दौऱ्यास शासन मान्यता देण्यात आली होती. तथापि, संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये मा. उच्च न्यायालयाने सदर विदेश दौऱ्यासाठीचा खर्च संक्षिप्त देयकावर करण्यास मान्यता देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जागतिक बँकेच्या व्यवसाय सुलभता अहवालामध्ये भारताचे मानांकन जागतिक क्रमवारीत उंचावण्यासाठी जागतिक बँक, कार्यालय, वॉशिंगटन (USA) येथे दि.०९.०१.२०२० ते दि.१०.०१.२०२० या कालावधीत आयोजित अभ्यास दौऱ्यासाठी दि.०६.०१.२०२० ते १४.०१.२०२० पर्यंत श्री. एस. बी. अग्रवाल, महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई, यांना सहभागी होण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. याद्वारे संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

३. या दौऱ्यासाठी येणारा एकूण रु.४,००,०००/- (रुपये चार लक्ष फक्त) इतका खर्च संक्षिप्त देयकावर करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| Air Fare to and fro (economy class) (Mumbai to Washington) | Rs.1,50,000/-(approx) |
| Accommodation for 7 days i.e. from 6th January, 2020 to 13th January, 2020. | Rs.1,00,000/-(approx) |
| Visa Charges | Rs.5,000/-(approx) |
| Daily Allowances for 9 days for foreign tour as applicable as per Government resolution or whichever is less. | Rs.1,00,000/-(approx) |
| Other expenses i.e. taxi fare, telephone roaming charges, insurance etc. | Rs.45,000/-(approx) |
| **Total** | **Rs.4,00,000/-(approx)** |

४. या प्रित्यर्थ होणारा खर्च हा **"मागणी क्रमांक जे-१, २०१४, न्यायदान, १०२ उच्च न्यायालय (०३)(०१) प्रबंधक अपील शाखा (अनिवार्य) (भारीत) २०१४ ००९२, १२-विदेश प्रवास खर्च"** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखालील सन २०१९-२० या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर मंजूरी खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

- शासन परिपत्रक क्र. मुंविनि-२०१७/प्र.क्र.३८/१७/विनियम, दि.१८.१२.२०१७ मधील सूचनेनुसार (२०१४ ००९२) या लेखाशिर्षाखाली दिनांक ३१.१२.२०१९ यापूर्वीची तपशिलवार देयके प्रलंबित नाहीत.
- दिनांक ३१.१२.२०१९नंतरच्या तपशीलवार देयकांचा त्वरेने निपटारा करण्यात येईल.
- या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.
- खर्च नियमित देयकाद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

- या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-याची राहिल.
- मासिक निधी विवरणपत्रानुसार याकरिता निधी उपलब्ध आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-दोन मधील अ.क्र. ११-अ, नियम क्र.३४ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०३१७०४०३२११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2020.01.03 16:50:49 +05'30'

**( अ. श्या. कलोती )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२) प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई.
३) प्रबंधक (लिगल ॲण्ड रिसर्च), उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.
४) मा. मुख्य न्यायमूर्ती यांचे प्रधान सचिव, उच्च न्यायालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी (का.२३/का.२४), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती.